न्यायालयीन प्रकरणात जिल्हा परिषदेकडून
जबाबदार अधिकाऱ्यांची नियुक्ती करणे व
त्यांच्या जबाबदाऱ्या निश्चित करणे.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः काव्यआ-२०१४/प्र.क्र.२६०/आस्था-१०**
**बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई-४०० ००१.**
**तारीख: ३१ ऑक्टोबर, २०१४.**

## शासन परिपत्रक

जिल्हा परिषद, नांदेड येथे तीन महिने रोजंदारीवर कार्यरत असलेल्या एका मजूराच्या प्रकरणी त्यांना कामावर घेण्याबाबत मा. न्यायालयानी आदेश दिलेले आहेत. या प्रकरणी असे निदर्शनास आले आहे की, संबंधित जिल्हा परिषद कायदेशीर सल्लागाराने कामगार न्यायालयात जिल्हा परिषदेची बाजू ठामपणे मांडली नाही. पर्यायाने या प्रकरणी जिल्हा परिषदेच्या विरोधात न्यायालयाचा निर्णय गेलेला आहे. शासनाच्या असेही निदर्शनास आले आहे की, सद्यस्थितीत बहुतांश कामगार न्यायालयात सुरु असलेल्या प्रकरणी जिल्हा परिषदेकडून जबाबदार अधिकाऱ्याची नियुक्ती केली जात नाही. केवळ कायदेशीर सल्लागारावर विसंबून न्यायालयीन प्रकरणी कार्यवाही सोडून दिली जाते. प्रकरणांचे गांभीर्य, कामगार न्यायालयाचे मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांच्या विरोधात जाणारे निर्णय पहाता, या प्रकरणी जिल्हा परिषद स्तरावर न्यायालयीन प्रकरणे गांभीर्याने हाताळले जात नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

२. बऱ्याचशा कामगार न्यायालयीन प्रकरणी कार्यवाही न झाल्याने किंवा प्रकरण अत्यंत ढिसाळपणे हाताळले गेल्याने प्रशासकीय विभागाच्या सचिवांच्या नावे नोटीस बजावण्यात येत व तद्नंतर शासन स्तरावरुन सूचना दिल्यानंतर या प्रकरणी कार्यवाही होते, असेही निदर्शनास आले आहे. ही बाब अत्यंत आक्षेपार्ह आहे.

३. सबब, सर्व मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांना असे सूचित करण्यात येते की, जिल्हा परिषदेच्या विरोधात सुरु असलेल्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये अशी न्यायालयीन प्रकरणे कामगार न्यायालयात असो, मा. उच्च न्यायालयात असो वा सर्वोच्च न्यायालयात असो, अशा प्रत्येक प्रकरणात जबाबदार अधिकाऱ्याची नियुक्ती करावी. तसेच या अधिकाऱ्यांना न्यायालयात सुनावणीच्यावेळी व्यक्तीश: हजर रहाण्याच्या सक्त सूचना देण्यात याव्यात. तसेच या प्रकरणात न्यायालयात आवश्यक ती कागदपत्रे व मुद्दे सादर केले जातील याबाबतचा आढावा सर्व मुख्य कार्यकारी यांनी प्रत्येक महिन्यातून एकदा घ्यावा.

४. याबाबत असेही स्पष्ट करण्यात येते की, न्यायालयीन प्रकरणात केवळ मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांनी बाजू मांडली नाही म्हणून जिल्हा परिषदेच्या विरोधात जर न्यायनिर्णय गेला तर त्याबाबतची सविस्तर कारणे व जबाबदार असणाऱ्या अधिकाऱ्यांविरोधात केलेली कारवाई याबाबतचा साध्यंत तपशील शासनास आठ दिवसात सादर करावा. न्यायालयीन प्रकरणे गांभीर्याने घेण्याबाबत आपल्या अधिपत्याखालील अधिकारी/ कर्मचारी यांना सक्त सूचना देण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२११३०००३०७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyadarshan Shankarraw Kamble

Digitally signed by Priyadarshan Shankarraw Kamble
DN: CN = Priyadarshan Shankarraw Kamble, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Reason: I am approving this document
Date: 2014.10.31 12:45:36 +05'30'

**(प्रि.शं.कांबळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) विभागीय आयुक्त, सर्व.

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

३) आस्था-७,८,९,११,१२ व १४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

४) निवड नस्ती, आस्था-१०.